# महाराष्ट्र शासन

क्र.जलसं- २०११/प्र.क्र.३५/जल-८,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २९ एप्रिल, २०११.

संदर्भ :- शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही २००४/प्र.क्र.१५/०४/१२, दि.२५ मे, २००६.

## कार्यालयीन आदेश

संदर्भाधीन शासन अधिसूचनेद्वारे महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ प्रसारित करण्यात आला आहे. सदर अधिनियमाच्या कलम ९ (१) व (२) अंतर्गत प्रत्येक विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांनी त्यांना दुय्यम अधिका-यास अंतिम निर्णय घेण्यासाठी शक्ती प्रदान करावयाच्या आहेत. तसेच विभागाशी / कार्यासनाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्यासाठी अधिका-यांचे तीन स्तर निर्धारित करण्याचे निदेश देण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने या कार्यासनाशी संबंधित विषयाच्या बाबतीत सोबतच्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिका-यांचे निर्देश असल्यास किंवा काही विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

२. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०४२९१०२३०००01 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वि. रा. ठाकूर )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) यांचे स्वीय सहाय्यक,
सचिव (ग्रामविकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहाय्यक,
उप सचिव (जलसंधारण) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व अधिकारी,
निवडनस्ती जल-८.

'प्रपत्र - अ'

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील कलम ९ (१) व (२) अंतर्गत कार्यासनाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्या-या अधिका-यांचे तीन स्तर खालीलप्रमाणे निर्धारित करण्यात येत आहेत :-

| अ. क्र. | विषय | स्तर | | | आदेश / निर्णय निर्गमित करण्यास सक्षम अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | **केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पाणलोट विकास कार्यक्रम -** वरील योजनेच्या निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | कार्यासन अधिकारी / उप सचिव |
| २ | **केंद्र पुरस्कृत नदीखोरे प्रकल्प** या योजनेच्या निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | कार्यासन अधिकारी / उप सचिव |
| ३ | **केंद्र पुरस्कृत एकात्मिक पाणलोट व्यवस्थापन कार्यक्रम -** या योजनेच्या धोरणात्मक बाबी, राज्य हिस्सा मंजूर करणे व वितरीत करणे व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | कार्यासन अधिकारी / उप सचिव |
| ४ | **पाणलोट विकास चळवळा -** या योजनेच्या धोरणात्मक बाबी, निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | कार्यासन अधिकारी / उप सचिव |
| ५ | **महात्मा ज्योतिबा फुले जल व भूमी संधारण अभियाना -** या योजनेच्या धोरणात्मक बाबी व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | कार्यासन अधिकारी / उप सचिव |
| ६ | **आदर्शगांव विकास कार्यक्रम -** या योजनेच्या धोरणात्मक बाबी, निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | कार्यासन अधिकारी / उप सचिव |